राज्यात पशु-पक्षीखाद्य गुणवत्ता समन्वय समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०२१/प्र.क्र.९३/पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- ३० जून, २०२३

<u>वाचा</u> :- १. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.वैवि / अ-५(२) / १८४२-४३/२०२३, पसं-१४, दि.२३.०६.२०२३
२. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन परिपत्रक क्र. वैवि/अ-५(२) /१८४४-२१११/ २०२३,पसं-१४, दि.२३.०६.२०२३.
३. मा. मंत्री (महसूल, पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास), यांच्या अध्यक्षतेखाली दि. २२.०६.२०२३ रोजी जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे येथे पार पडलेली बैठक.

**<u>प्रस्तावना :-</u>**

मा.मंत्री (महसूल, पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास), यांच्या अध्यक्षतेखाली दि. २२.०६.२०२३ रोजी जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे येथे पशु-पक्षीखाद्य गुणवत्ता व दर समन्वय या अनुषंगाने बैठकीचे आयोजन करण्यात आलेले होते. सदर बैठकीस सहकारी दुध संघ, खाजगी दुध संकलन संस्था, पशुखाद्य उत्पादक संस्था व दुध उत्पादक उपस्थित होते.

२. सदर बैठकीत राज्यातील दुध उत्पादक शेतकरी, पशुपालक, कुक्कुट व्यवसायिक यांच्याकडील पशु-पक्ष्यांना गुणवत्तापूर्ण पशुखाद्य किफायतशीर दरात उपलब्ध होण्याच्या अनुषंगाने सविस्तर चर्चा करण्यात आली. चर्चेअंती मा. मंत्री महोदय यांनी आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे अध्यक्षतेखाली सर्वसमावेशक राज्यस्तरीय पशु-पक्षीखाद्य गुणवत्ता व दर समन्वय समिती गठीत करण्याबाबतचे निर्देश दिलेले आहेत. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

३. राज्यात खालीलप्रमाणे राज्यस्तरीय पशु-पक्षीखाद्य गुणवत्ता व दर समन्वय समिती गठीत करण्यास याव्दारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय पशु-पक्षीखाद्य गुणवत्ता व दर समन्वय समितीची संरचना**

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३ | सहआयुक्त (अन्न), अन्न व औषधी प्रशासन, पुणे | सदस्य |
| ४ | विभाग प्रमुख, पशुपोषण विभाग,पशुवैद्यकीय महाविद्यालय, शिरवळ, जि. सातारा | सदस्य |
| ५ | प्रादेशिक दुग्ध व्यवसाय विकास अधिकारी, पुणे | सदस्य |
| ६ | विभागीय संचालक, फुड सेफ्टी अँड स्टँडर्ड ॲथॉरीटी ऑफ इंडिया, बांद्रा, मुंबई किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | विभागीय संचालक, भारतीय मानक संस्था (बीआयएस), पुणे | सदस्य |
| ८ | उपआयुक्त पशुसंवर्धन (विषशास्त्र), भारतरत्न अटलबिहारी वाजपेयी राज्यस्तरीय रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे | सदस्य |
| ९ | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, पशुखाद्य विश्लेषण प्रयोगशाळा, गोखलेनगर, पुणे | सदस्य |
| १० | व्यवस्थापक,पशुखाद्य कारखाना , महाराष्ट्र कृषि विकास महामंडळ, चिंचवड, पुणे (सुग्रास पशुखाद्य) | सदस्य |
| ११ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई यांचे प्रतिनिधी (वैभव पशुखाद्य) | सदस्य |
| १२ | कंपाउंड लाइव्हस्टॉक फिड मॅन्युफॅक्चरींग असोसीएशन (क्लॅफमा), मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १३ | व्यवस्थापक,पशुखाद्य कारखाना, कोल्हापूर जिल्हा सहकारी दुध उत्पादक संघ (गोकुळ), कोल्हापूर | सदस्य |
| १४ | व्यवस्थापक, पशुखाद्य कारखाना, पुणे जिल्हा सहकारी दुध उत्पादक संघ (कात्रज), पुणे | सदस्य |
| १५ | व्यवस्थापक, पशुखाद्य कारखाना, हिंदुस्थान फिड्स, सातारा | सदस्य |
| १६ | व्यवस्थापक, पशुखाद्य कारखाना, गोदरेज फिड्स, मुंबई | सदस्य |
| १७ | विभागीय व्यवस्थापक, राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ (एनडीडीबी), मुंबई | सदस्य |
| १८ | वेंकिज इंडिया लिमिटेड, यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १९ | उपसंचालक (वैरण विकास) पशुसंवर्धन आयुक्तालय,पुणे | सदस्य सचिव |

४. समितीला आवश्यकतेप्रमाणे इतर विभागातील अधिकारी अथवा तज्ञ व्यक्तींना, इतर पशुखाद्य उद्योगांचे प्रतिनिधी, प्रगतिशील पशुपालक / शेतकरी यांना निमंत्रित करण्याचे अधिकार असतील.

५. उपरोक्तप्रमाणे गठित करण्यात आलेल्या समितीची तीन महिन्यातून किमान एक बैठक आयोजीत करण्यात यावी.

६. समितीने राज्यातील उत्पादित व विक्री होणाऱ्या पशु-पक्षी खाद्याच्या गुणवत्तेबाबत आणि किफायतशीर दरांबाबत सर्वंकष चर्चा करावी. तसेच, पशुपालक यांच्याकडून प्राप्त होणाऱ्या सूचना त्या अनुषंगाने खाद्य उत्पादक कंपन्यांचे प्रतिनिधी आणि केंद्र / राज्य शासनाच्या विभागांचे प्रतिनिधी यांच्याशी चर्चा करून समन्वयाने उपाययोजना करण्यात याव्यात. समितीतील आढाव्यानंतर राज्यातील पशु-पक्षीपालकांना गुणवत्तापूर्ण पशु-पक्षी खाद्य किफायतशीर दरात उपलब्ध होण्याकरीता शासनास धोरणात्मक उपाययोजना शिफारशी करण्यात याव्यात.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेताक २०२३०६३०१३२८५४१९०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Marale Niwrutti Bhaguji

Digitally signed by Marale Niwrutti Bhaguji
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, pseudonym=85DEC352A563C6C48CE612C5F1F3DBE440A34530, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=Marale Niwrutti Bhaguji
Date: 2023.06.30 15:23:52 +05'30'

**( नि. भा. मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
२. अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे.
३. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे.
४. सहआयुक्त (अन्न), अन्न व औषधी प्रशासन, पुणे
५. विभाग प्रमुख, पशुपोषण विभाग,पशुवैद्यकीय महाविद्यालय, शिरवळ, जि. सातारा.
६. प्रादेशिक दुग्ध व्यवसाय विकास अधिकारी, पुणे.
७. विभागीय संचालक, फुड सेफ्टी अँड स्टँडर्ड ॲथॉरीटी ऑफ इंडिया, बांद्रा, मुंबई.
८. विभागीय संचालक, भारतीय मानक संस्था (बीआयएस), पुणे.
९. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
१०. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
११. उपआयुक्त पशुसंवर्धन (विषशास्त्र), भारतरत्न अटलबिहारी वाजपेयी राज्यस्तरीय रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे.
१२. पशुसंवर्धन उपायुक्त, गुण नियंत्रण प्रयोगशाळा, गोरेगाव, मुंबई.
१३. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त.
१४. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, पशुखाद्य विश्लेषण प्रयोगशाळा, गोखलेनगर, पुणे.
१५. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.
१६. व्यवस्थापक,पशुखाद्य कारखाना , महाराष्ट्र कृषि विकास महामंडळ, चिंचवड, पुणे (सुग्रास पशुखाद्य).

१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई यांचे प्रतिनिधी (वैभव पशुखाद्य)
१८. कंपाउंड लाइव्हस्टॉक फिड मॅन्युफॅक्चरींग असोसीएशन (क्लॅफमा), मुंबई यांचे प्रतिनिधी.
१९. व्यवस्थापक,पशुखाद्य कारखाना, कोल्हापूर जिल्हा सहकारी दुध उत्पादक संघ (गोकुळ), कोल्हापूर.
२०. व्यवस्थापक, पशुखाद्य कारखाना, पुणे जिल्हा सहकारी दुध उत्पादक संघ (कात्रज), पुणे.
२१. व्यवस्थापक, पशुखाद्य कारखाना, हिंदुस्थान फिड्स, सातारा.
२२. व्यवस्थापक, पशुखाद्य कारखाना, गोदरेज फिड्स, मुंबई.
२३. विभागीय व्यवस्थापक, राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ (एनडीडीबी), मुंबई.
२४. वेंकिज इंडिया लिमिटेड, यांचे प्रतिनिधी.
२५. उपसंचालक (वैरण विकास) पशुसंवर्धन आयुक्तालय,पुणे.
२६. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. निवड नस्ती (पदुम-४).